नक्षलवाद्यांसाठी आत्मसमर्पण योजनेस मुदतवाढ देण्याबाबत.......................

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- एनएएक्स- ०८२१/प्र.क्र.१८८/विशा १(ब)**
२ रा मजला, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.,
दिनांक- १९ जुन, २०२४.

**पहा :-**

१. शासन निर्णय क्र.- एनएएक्स- ०८२१/प्र.क्र.१८८/विशा १ (ब), दि. ७ सप्टेंबर, २०२१.

२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/२१-अ/१९५/नक्षल आत्मसमर्पण योजना/८०/२००९, दि. २८.०७.२०२३.

**प्रस्तावनाः-**

राज्यातील नक्षलवाद्यांसाठी शासनाच्या दि. २९.०८.२००५ च्या शासन निर्णयानुसार आत्मसमर्पण योजना जाहीर करण्यात आली. दि. १.०४.२०१३ पासून आत्मसमर्पण योजनेत बदल करुन आत्मसमर्पण योजना सुधारीत करण्यात आली आहे. दि. ७.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये आत्मसमर्पण योजनेस दि. २९.०८.२०२१ ते २८.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. नक्षल चळवळींवर अंकुश आणण्याच्या दृष्टीने आत्मसमर्पण योजना एक यशस्वी अस्त्र म्हणून सिध्द झाली असल्याने या योजनेस दोन वर्षाची मुदतवाढ देण्याची विनंती पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्यांच्या दि. २८.०७.२०२३ च्या पत्रान्वये केली आहे. त्यानुसार सदर आत्मसमर्पण योजनेला मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील नक्षलवाद्यांसाठी दि. २९.०८.२००५ च्या शासन निर्णयानुसार जाहीर केलेल्या आत्मसमर्पण योजनेत बदल करुन दि. १.०४.२०१३ पासून शासनाने सुधारीत आत्मसमर्पण योजना सुरु केली आहे. सदरहू आत्मसमर्पण योजनेस या शासन निर्णयान्वये दि. २९.०८.२०२३ ते २८.०८.२०२५ या दोन वर्षाच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. या प्रयोजनार्थ होणारा खर्च "मागणी क्र. बी-१-२०५५ पोलीस- (००) (१०९) जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस बल, २० इतर प्रशासकीय खर्च २०५५ ०१६८ (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन तो मंजूर अनुदानामधून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३६३/२०२४/व्यय-७, दि. ०५.०६.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mahrashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१९१४४३११४८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

JAHANGIR KYAMUDDIN KHAN

Digitally signed by JAHANGIR KYAMUDDIN KHAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=0514d0441bc151d360aa9723b622b5ac853f58450638828ec27f54c83e1c36e9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D8DF82CCD86411440F872E806944C68D20B4533D6C7D7079D601D1337F7E8B66, cn=JAHANGIR KYAMUDDIN KHAN
Date: 2024.06.19 15:00:07 +05'30'

**( जहांगीर खान )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. सर्व मा. मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
८. वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
९. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. रोजगार व स्वयंरोजगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२०. विशेष पोलीस महानिरीक्षक (नक्षलविरोधी अभियान), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२१. पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, गडचिरोली.
२२. जिल्हाधिकारी, गडचिरोली / चंद्रपूर / भंडारा / गोंदिया / यवतमाळ / नांदेड.
२३. पोलीस अधिक्षक, गडचिरोली / चंद्रपूर / भंडारा / गोंदिया / यवतमाळ / नांदेड.
२४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली/चंद्रपूर/भंडारा/गोंदिया/यवतमाळ/नांदेड.
२५. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली / चंद्रपूर / भंडारा / गोंदिया / यवतमाळ / नांदेड / नागपूर.
२६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२७. शिक्षणाधिकारी, गडचिरोली / चंद्रपूर / भंडारा / गोंदिया / यवतमाळ / नांदेड / नागपूर.
२८. निवडनस्ती (कार्या- वि.शा.१ब), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.